नीरा डावा कालवा पाटबंधारे उपविभाग, निमगांव या उपविभागीय व सिंचन शाखा कार्यालयांचे विभागीय नियंत्रण पुणे पाटबंधारे विभाग, पुणे अंतर्गत वर्ग करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांक : आढावा-२०१६/प्र.क्र.१५५/२०१६/आ.(प्रशि.)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०८ नोव्हेंबर, २०१६.

वाचा : शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्रमांक आढावा-२०१६/प्र.क्र.१५५/२०१६/आ.(प्रशि.), दि.२१.१०.२०१६.

**शुध्दीपत्रक-**

पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे अंतर्गत सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरीत होणाऱ्या कार्यालयांबाबत संदर्भिय शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

त्यानुसार शासन निर्णयातील अनुक्रमांक १ मध्ये नीरा डावा कालवा पाटबंधारे उपविभाग, निमगांव या उपविभागीय व त्यातंर्गतच्या सिंचन शाखा कार्यालयांच्या विभागीय नियंत्रणात बदल करण्यात येत असल्याने शासन निर्णयातील अ.क्र.१ पुढील प्रमाणे वाचावा.

१. पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे अंतर्गतचा चासकमान प्रकल्प विभाग, पुणे हा विभाग बांधकाम कार्यप्रकारातून सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरीत करुन, चासकमान पाटबंधारे विभाग, पुणे या नावाने पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे अंतर्गत कार्यान्वित करण्यात येत आहे. तसेच लघु पाटबंधारे सर्वेक्षण उपविभाग, बारामती हा उपविभाग बांधकाम कार्यप्रकारातून सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरीत करुन, नीरा डावा कालवा पाटबंधारे उपविभाग, निमगांव या नावाने २ नवीन सिंचन शाखा कार्यालयांच्या निर्मितीने व २ अस्तित्वातील अशा ४ सिंचन शाखा कार्यालयांसह पुणे पाटबंधारे विभाग, पुणे अंतर्गत कार्यान्वित करण्यात येत आहे.

२. शासन निर्णयासोबतच्या प्रपत्र-अ मधील स्तंभ २ येथील नीरा डावा कालवा पाटबंधारे उपविभाग, निमगांव व अंतर्गतच्या ४ सिंचन शाखा कार्यालयांचे विभागीय नियंत्रण पुणे पाटबंधारे विभाग, पुणे असे वाचावे.

३. पुणे पाटबंधारे विभाग, पुणे कार्यालयाचे कार्यकारी अभियंता हे संबंधित उपविभागीय व सिंचन शाखा कार्यालयांचे आहरण व संवितरण अधिकारी राहतील.

४. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्र. २०१६११०८१७१२०३६८२७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vijay Karbhari Chaudhari
Date: 2016.11.08 17:15:04 +05'30'

**(वि. का. चौधरी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.

३) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
४) मा.मंत्री (खारजमीन) यांचे खाजगी सचिव.
५) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक.
६) मा.विधानसभा/ विधान परिषद सदस्य (सर्व)
७) प्रधान सचिव (ज.सं.प्र.व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सचिव (ज.सं.व्य.व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
११) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर.
१२) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३) सर्व कार्यकारी संचालक, महामंडळे /सर्व महासंचालक.
१४) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
१५) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) मुख्य अभियंता (जलसंपदा), जलसंपदा विभाग, पुणे.
१७) सर्व मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१८) आंतर वित्तीय सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
१९) अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे.
२०) अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे.
२१) अधीक्षक अभियंता, ई-प्रशासन मंडळ, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
(कार्यालयांच्या बदलाची आवश्यक ती नोंद घेण्यास्तव)
२२) कार्यकारी अभियंता, चासकमान प्रकल्प विभाग, पुणे.
२३) कार्यकारी अभियंता, पुणे पाटबंधारे विभाग, पुणे.
२४) कार्यकारी अभियंता, खडकवासला पाटबंधारे विभाग, पुणे.
२५) सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२६) आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ.